युवा वसतीगृहामध्ये विविध सुविधा उपलब्ध करुन देण्याकरीता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : युकयो-२०२५/प्र.क.१७/क्रीयुसे-३**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : २९ मार्च, २०२५.**

**वाचा :-** १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, युकयो-२०१२/प्र.क्र.६६/क्रीयुसे-३, दि. २८ एप्रिल, २०१४.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १२ फेब्रुवारी, २०२५.

३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. निधी वितरण/युवावसतिगृह योजना-५५७३/२०२४-२५/का-१०/४२३१, दि. ३१ जानेवारी, २०२५.

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १७ मार्च, २०२५.

५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. निधी वितरण/युवावसतिगृह योजना-५५७३/२०२४-२५/का-१०/५४९५, दि. २८ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :**

युवांना नोकरी, व्यवसाय, शिक्षण, मुलाखती, मार्गदर्शन व प्रशिक्षणासाठी वेळोवेळी शहरांमध्ये जावे लागत असून त्याठिकाणी त्यांना त्यांच्या निवासासाठी हक्काचे असे ठिकाण उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने राज्यातील सहा महसूल विभागाच्या मुख्यालयाच्या ठिकाणी रुपये ४००.०० लक्ष इतक्या अनुदानाच्या मर्यादेत अद्ययावत अशा युवा वसतीगृहाची स्थापना करण्यास संदर्भ क्रमांक (१) च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. आता, उक्त युवा वसतीगृहाचे व्यवस्थापन पहाण्यासाठी कर्मचारी वर्ग व फर्निचर, पिण्याचे पाण्यासाठी वॉटर कुलर, दुरचित्रवाणी संच, गादी उशी बेड, टेबल, टीपॉय, खुर्च्या, वातानुकुलित यंत्रणा लावणे, सी.सी.टि.व्ही बसविणे, ई-लायब्ररी, लॅनसुविधा, कॅटिन/कॉन्फरन्स हॉल यासारख्या सुविधा उपलब्ध करून देण्याकरीता सन २०२४-२५ मध्ये रु. ५०.०० लक्ष अर्थसंकल्पित निधीपैकी रु. ३५.०० लक्ष (अक्षरी रूपये पस्तीस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

युवा वसतीगृहामध्ये वरीलप्रमाणे विविध सुविधा उपलब्ध करुन देण्याकरीता सन २०२४-२५ मध्ये रु. ५०.०० लक्ष अर्थसंकल्पित निधीपैकी रु. ३५.०० लक्ष (अक्षरी रूपये पस्तीस लक्ष फक्त) इतका वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर वसतिगृहांनी केलेल्या मागणीनूसार खालील तक्त्यात नमूद केल्यानूसार निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.:-

| अ.क्र | वसतीगृहाचे नाव | रक्कम |
|---|---|---|
| १ | युवक वसतीगृह, छत्रपती संभाजीनगर | रु. ८,७५,०००/- |
| २ | युवक वसतीगृह, नाशिक | रु. ८,७५,०००/- |
| ३ | युवक वसतीगृह, अमरावती | रु. ८,७५,०००/- |
| ४ | युवक वसतीगृह, नागपूर | रु. ८,७५,०००/- |

२. सदरीत उपक्रमाकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०३, (१०) (११) युवा धोरणांतर्गत युवा वसतीगृह स्थापना करणे(कार्यक्रम) ३१, सहायक अनुदान, २२०४-५५७३ या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर निधी खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे. :-

१) प्रस्तावित कामासाठी उपलब्ध करुन देण्यात येणा-या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास सादर करणे बंधनकारक राहिल.

२) सदर निधीच्या खर्चाची तपशिलवार माहिती शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

३) वित्त विभाग शासन परिपत्रक दि.१७.०३.२०२५ मधील परि-५ नुसार सदर लेखाशिर्षाखाली वितरीत करण्यात येणारा निधी दि.३१.०३.२०२५ पूर्वी खर्ची पडेल याची आयुक्त, क्रीडा व युवक कल्याण यांनी दक्षता घ्यावी.

४) सदरचा निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा.

५) राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/शासन निर्णय वित्तीय नियमावली व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेतील तरतुदी यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६) प्रस्तावातील खरेदीसंदर्भातील बाबींसाठी उद्योग, उर्जा कामगार विभागाचा शासन निर्णय दिनांक १/१२/२०१६ अन्वये विहित खरेदी धोरणाचा अवंलब करणे आवश्यक राहील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, दि. १२ फेब्रुवारी, २०२५ व दि. १७ मार्च, २०२५ मधील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. याकरीता, संबंधित विभागीय उपसंचालक यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित लेखाशिर्षांतर्गत यावर्षी करण्यांत आलेल्या मंजूर तरतुदीच्या अर्थसंकल्पिय निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही या अटीच्या अधीन राहून, हा निधी वितरित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अ.नौ.सं. क्र. १६५/१४७१, दिनांक २७.०२.२०२५ व वित्त विभागाच्या अ.नौ.सं. क्र. ४५९/व्यय-५, दिनांक २५.०२.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या (www.maharashtra.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३२९१७०६३४६३२१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA
KETAN TONDE

Digitally signed by KAVITA KETAN TONDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=School Education Department,
2.5.4.20=d9d6cb2ca7858ab2922f2f069c1dcf0c59dbd6f04e8ac435f94b342b3c624ecc, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=a738d4711deb1f586dd1811780ba863704a1ea496ff9ec7d1b6a62b204ab4751, cn=KAVITA KETAN TONDE
Date: 2025.03.29 17:07:29 +05'30'

**( कविता तोंडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई
६. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक,
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. महालेखापाल ( लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
११. महालेखापाल ( लेखा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
१२. विभागीय उपसंचालक (छत्रपती संभाजीनगर, नाशिक, अमरावती, नागपूर), क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य.
१३. वित्त विभाग (व्यय-५)/नियोजन विभाग (का. १४७१), मंत्रालय, मुंबई.
१४. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (क्रीयुसे-३)